बाल नेटाक्षरी

संपादिका  : सौ अनघा हिरे (नाशिक)

सजावट  : सौ. अनघा हिरे

मुखपृष्ठ :   आदिती हिरे

प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान

नाम गुम जायेगा

www.esahity.com

9869674820

E mail : balnetakshari@gmail.com

9422284116

# नेटवरची धम्माल मस्ती

बच्चे कंपनी

पंधरा वर्षांपुर्वी लोकांना इंटरनेट माहित नव्हतं. ATM नव्हतं. मोबाईल नव्हते. बहुतेक लोक कॉंप्युटर शिवायच काम करायचे. अजून पंधरा वर्षांनंतर इंटरनेट शिवाय कसलंच काम होणार नाही अशी परिस्थिती असेल. आता तुम्ही जी मुलं आहात ती मोठी झाल्यावर तुमचं पान इंटरनेट शिवाय हलणार नाही बुवा. पण तरीही तुमचे आई बाबा तुम्ही इंटरनेट्ला हात लावला की तुम्हाला रागावतात का ? इंटरनेट वर जास्त बसू देत नाहीत का ?

कारण माहित आहे ? इंटरनेट जितकं चांगलं तितकंच वाईट. इंटरनेटवर फ़सवणूक पण खूप असते. काय बघावं काय बघू नये याचं मार्गदर्शन नसेल तर मुलं कुठल्या कुठे वाहत जाऊ शकतात. फ़सू शकतात. कॉंप्युटर बिघडू शकतो. व्हायरस येतात.

त्यात इंटरनेटवर जिकडे जावं तिकडे इंग्रजीच इंग्रजी. मग आपण मराठी मुलांनी करायचं काय? आपल्याला आपलं मराठी इंतरनेट हवं की नको ? तेव्हा ई साहित्य प्रतिष्ठानने आणलंय मुलांसाठी खास मासिक. बालनेटाक्षरी. यात मराठी मुलांना लिहायला वाव आहे. आणि माहिती मिळायलाही. यातून आपण इंटरनेट कसं वापरायचं. काय बघायचं, काय टाळायचं ते सगळं समजून घ्यायचं आहे. तुम्हाला आपल्या मित्रमंडळींना काही सांगायचं असलं, गोष्ट, कविता लिहायची असली किंवा आपण काढलेली चित्रं फ़ोटो दाखवायचे असले तर आमच्या कडे पाठवून द्या. पालकांना आणि दादा ताईंना सुद्धा विनंती. आपल्या कडच्या छोट्टु कंपनीने काही कौतुक करण्यासारखं केलं बनवलं लिहीलं तर आमच्याकडे पाठवा. आपण आज कौतुक केलं तरच ती मुलं उद्या काही पराक्रम करणार ना !

आमचा पत्ता : balnetakshari@gmail.com


नाते तुमचे-आमचे
हळुवार जपायचे,
तिळगुळ-हलव्यासंगे
अधिक दृढ करायचे
तिळगुळ घ्या,गोड गोड बोला !!!
www.marathikavitablog.blogspot.com


नात्यातील कटुता इथेच संपवा....
झाले - गेले विसरुन जाऊ
तिळगुळ खात गोड गोड बोलु..!
संक्रांतीच्या हार्दिक शुभेच्छा...!

काय मग छोट्या दोस्तानो ,

कसे आहात?

नाताळच्या सुट्टीत धम्माल केली ना!

काय काय मजा केली ? मला मेल करायचा कंटाळा येतो का?

आज तुम्हाला एक सांगायचे आहे संक्रांतीला तुम्ही पतंग उडवणार असालच ना? पण जरा जपून हं! उगाच काटलेल्या पतंगीच्या मागे लागू नका . पतंग उडवताना काळजी घ्या . आणि वाहने जिथे ये जा करतात तिथे तर अजिबात पतंग उडवू नका ..

संक्रांतीचा सणाची मजा मला सर्वांनी सांगायची बर का!

खूप खूप मजा करा अभ्यास करा आणि तिळगुळ वाटायला पण जा .

तुम्हा सर्वांना संक्रांतीच्या खूप खूप खूप खूप शुभेच्छा !

पुढच्या महिन्यात नवीन बालनेटाक्षरीच्या नव्या अंकासह नक्की भेटूया ...

## तिळगुळ घ्या गोड गोड बोला

टाटा

तुमचीच

अनघा ताई






"काय आज कशी आहे तब्येत? नाही म्हणजे, काल तुम्ही आधी ठणाठणा ओरडत होतात. आणि नंतर तुमच्या तोंडातून फेस बाहेर उतू जात होता. असला प्रकार या आधी मी तरी कधी पाहिला नव्हता हो, म्हणून चौकशी केली." हे इतकं बोलून सुध्दा त्याचं तोंड उघडंच होतं.

"अहो खरं सांगू का, कुणीतरी आपली चौकशी केली तर खूप बरं वाटतं. माझं पहिलं तोंड प्रेमाने भिजून जातं!"

"काऽऽय? तुम्हाला दोन तोंडं आहेत?"

"हो! आमचं घराणं जरी मोठं असलं तरी त्यातले काही 'दूतोंडे' असतात तर काही 'एकतोंडे' असतात. आणि या बिचाऱ्या एकतोंड्यांची तर आणखीनच मजा आहे."

"म्हणजे?"

"अरे आता हे पाहा, आपल्या सगळ्यांची तोंडं वरती असतात किनई? म्हणजे आता मला दोन तोंडं आहेत पण ती वरतीच आहेत ना?"

"शीऽऽ! हा काय प्रश्न झाला?

अहो तोंड वरती असेल तरच नीट खाता येईल ना? माणसांचीच काय पण जनावरांची तोंडं पण वरतीच असतात!

खरं सांगतो.. मी तरी अजून कुणी मागे तोंड असलेला किंवा खाली तोंड असलेला माणूस किंवा जनावरही पाहिलेलं नाही!"

"तुमची पण कमालच आहे! तुम्हाला काही सांगायला गेलं तर तुम्ही त्याचा पार भुगाच करून टाकता."

"काय करणार, आदत से मजबूर!

बरं पुढं बोला. काय ते पटकन सांगा. उगाच फेस काढत बसू नका."

"या एकतोंड्यांमधे दोन प्रकार आहेत. एक आहेत आपल्यासारखेच 'वरतोंडे' पण.. .. दुसरे जरा विचित्रच आहेत. त्याचं तोंड समोरच असतं पण वरती नाही तर मध्यभागी असतं. त्याचं थोबाड ही मोठं असतं. तुमच्यात पण असतात का असे 'समोरतोंडे' की फक्त वरतोंडेच?"

"असला प्रश्न विचारण्याची तुझी हिंम्मतच कशी झाली? अरे.. आमचा संबंध हा अन्नाशी असतो. जेवणाशी असतो. आणि अन्न हे पूर्णब्रम्ह असल्याने आम्हाला डोक्याने काम करावं लागतं. प्रत्येकवेळी डोकं चालवावं लागतं. म्हणून.. आमच्या डोक्यात माणसं वेगवेगळी तोंड बसवतात. अहो.. 'आमचं डोकं चाललं तरच माणसांची तोंडं चालतात' अशी आमच्यात म्हण आहे ती काय उगाच? अभी कुछ समझे?" मिक्सर एव्हढं बोलला तरी त्या

सेमी ऑटोमॅटिक वॉशिंग मशिनला फारसं काही कळलंच नाही.



त्याने विचारलं,"मला सांग तू पण आमच्यासारखा दूतोंड्याच आहेस ना?" "अरे मी एकावेळी एकतोंडे पण शंभर टक्के वरतोंडे!!" "आता हे काय नवीनच?" "अरे माणसांच्या तोंडाला जशी खाज सुटेल तशी ते माझी तोंडं बदलतात. समजा.. घरातल्या छोट्या मुलांनी हट्ट केला की आम्हाला फ्रूट ज्यूस पाहिजे की मग ही घरातली माणसं माझ्या डोक्यात ज्युसर बसवतात.मी डोकं चालवून ज्युस काढतो.



आजोबा आजींना हवा असतो मिल्कशेक. मग ज्युसर काढतात आणि शेकर लावतात. झणझणीत चटणी हवी असेल तर ग्राइंडर लावतात. भाज्या चिरायला, कांदा कापायला, बटाट्याचे काप करायला इतकंच काय कणीक मळायला सुध्दा मला माझंच डोकं वापरावं लागतं..."

“बापरे ! .. ..
.. म्हणजे ही माणसं आपल्या स्वतःच्या डोक्यांनी काहीच काम करत नाहीत असं दिसतंय.

अगदीच बिनडोक!! पण डोकं चालवून-चालवून तुझ्या पोटातली मोटर पार थकून जात असेल नाही का ?” “अरे मोटर तर थकतेच पण गरगर पाती फिरवून तोंड सुध्दा गरम होतं. काहीवेळा ही बिनडोक माणसं माझ्या तोंडात इतकं काही कोंबतात की मला घुसमटायलाच
होतं. घशात रोठरा बसतो. विजेचे धक्के बसले तरी तोंडतली पाती काही फिरत नाहीत. अशावेळी अक्षरशः जीव जायची पाळी येते... ...” “ काय करतोस मग..”
“काही नाही. तोंड बंद करुन पोटातून गुरगर्र गुरगुर्र असा आवाज काढला की ही माणसं घाबरतात.
प्रत्येकाला आपल्या पोटाची काळजी असतेच ना. मग घेतात सांभाळून मला.”




“गप्पा मारताना तुझ्या त्या अगोदरच्या प्रश्नाचं उत्तर द्यायचं

राहूनच गेलं बघ.

आता आपण जरी वरतोंडे असलो तरी आपण काही पैसे खात नाही. काल त्यांनी पॅण्टी धुवायला टाकल्या आणि त्यासोबत खिशातली चिल्लर पण. त्यामुळे माझ्या पोटात सुरू झाला चिल्लर ऑर्केस्ट्रा.

प्रमाणात साबण पावडर खाल्ली तर पचते आम्हाला. पण पावडर झाली डब्बल.

मग.. मला झालं अपचन!

साबणाच्या अशा काही उचक्या लागल्या, ढेकरा आल्या, शिंका आल्या की नाकातोंडातून साबणाच्या फेसाचा महापूर उसळला!!..”

“साबणाची पावडर खाताना तुला मळमळत नाही?”

“काहीतरीच काय?

अरे.. लसूण चटणी खाणारं किंवा मिल्क शेक पिणारं वॉशिंग मशीन पाहिलं आहेस का तू कधी?

आम्ही आवडीने साबण पावडर खातो आणि ताकदीने कपड्यातला मळ बाहेर खेचून काढतो.

हल्ली तर रंगीबेरंगी आणि मस्त वासाच्या पावडरी मिळतात.

अरे ‘ज्याला साबणाची चव लागली त्याला स्वच्छता कळली’ ही चिनी म्हण तू ऐकलाच असशील म्हणा.

“मी पण चाखलाय साबण”

“खरं की काय?”

“मी आधी काहीही खाल्लं तरी मुखशुद्धीला साबणच खातो. तेव्हा कुठे मी स्वच्छं होतो!

‘जेव्हा वरतोंडे गरगर गरगर गरगरतात तेव्हाच माणसे भरल्यापोटी स्वच्छं कपडे घालुन फिर-फिर फिरफिरतात’ ही चिनी म्हण आपल्यालाच लागू आहे नाही का?”

तुम्हाला काय वाटतं?



★राजीव तांबे.

::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::

# दोन बहिणी

तसा विचार केला तर त्या दोघी बहिणीच.

एकाच घरात पण बाजू बाजूच्या खोलीत राहणाऱ्या.

सकाळ झाली की त्या हातपाय ताणून आळस द्यायच्या. त्याचवेळी घरातून बाहेर डोकवायच्या.



मग दिवसभर तशाच अवस्थेत दोघींच्या गप्पा आणि टिंगल टवाळ्या सुरूच. रस्त्यावरुन जाणाऱ्या येणाऱ्यांकडे त्या दोघी अगदी बारीक लक्ष ठेवायच्या. 'हा कधी जातो? आणि तो कधी येतो? ही काय करते? आणि ते काय करतात?' हेच दिवसभर पाहात बसायचं... टाइमपास करत.

कुणी येवो न येवो, याचं लक्ष सतत रस्त्याकडे!

कधी कधी यांच्या डोक्यावर कावळे,चिमण्या किंवा कबुतरं येऊन बसत. पण त्यांना याची पर्वाच नाही. त्या ढीम्मच!

काहीवेळा चिमण्या जाता-जाता त्यांच्या डोक्यावर दोन गरम-गरम मऊ-मऊ ठिपके टाकून जात. पण त्या दोघी बहिणी त्या चिमण्यांशी कधीही भांडल्या नाहीत. किंवा डोकं हलवून त्यांना उडवलं पण नाही. त्यांचे आपले परिसर निरीक्षण सुरूच!

संध्याकाळ झाली. अंधारुन आलं की, त्या दोघी जणी आपापल्या खोल्यात स्वतःला बंद करुन घेत.

सकाळ झाली की पुन्हा या दोघींचा बाहेर डोकावून टाइमपास सुरू.

पण अचानक एके दवशी.. .. एक बहिण बोलेच ना. एकदम खीन्न! उदास!

दुसऱ्या बहिणीला तिची काळजी वाटू लागली. तिला कळेना हिला झालं काय?

इतक्यात ती पहिली म्हणाली,"ताई, उद्यापासून मी बाहेर डोकावणार नाही.

तुला पाहणार नाही.

तुझ्याशी एक शब्द ही बोलणार नाही.

आपण आता पुन्हा कधी-कधी भेटणार नाही ग.

आज आपल्या मैत्रीचा शेवटचा दिवस!! "

हे बोलताना तिला खूप भरुन आलं.

तिच्या काचा थंड पडल्या.

काळजीने धुरकट झाल्या.

हे पहिलीचं बोलणं सताड उघड्या तोंडाने दुसरी ऐकत होती.

भीतीने तिच्या काचा तापल्या.

कसबंसं स्वतःला सावरत दुसरीने स्वतःची कडी घट्ट केली.

उघड्या तोंडातून भरपूर हवा आत घेतली.

आणि.. ..धीर करुन तिने विचारलं,“मला नीट सांग, उद्या नक्की काय होणार आहे?”



“उद्या माझा मेकओव्हर आहे!

यू नो, पूर्वीची ती दिवाणखाना ही कनसेप्ट आता गेली. आता त्याचं लिव्हिंग रुम मधे रुपांतर झालं! एव्हरीथींग इज नाऊ अल्ट्रा मॉडर्न!!..”

“काय ग, ही कुठली भाषा? काल पर्यंत तर तू ठीक होतीस! आणि हे मेक ओव्हर म्हणजे काय?”

“गेले आठ दिवस मी रोज हीच भाषा ऐकतेय.

अगं मेकओव्हर म्हणजे, सोप्या सुटसुटीत गोष्टी मोडून टाकून विचित्र अवजड गोष्टी आणायच्या!

आता त्या फोल्डींगच्या खूर्च्या किती छान आहेत! ती छोटी मुलं त्यावर उभं राहून आपल्यातून डोकावतात आणि आई बाबांना टाटा करतात तेव्हा किती बरं वाटतं ना? आता त्या मोडून त्याच्या बदली म्हणे ‘बीन बॅग्ज’ आणणार आहेत!

ट्यूब लाइटशी गप्पा मारताना संध्याकाळ कशी निघून जायची ते कळायचं पण नाही.

पण आता म्हणे भिंतीत फिट्ट बसणाऱ्या काचेमागे दिवे लावणार आहेत. ”

“अगं ताई, हे तर भयानकच बाई!! या दिव्यांची तोंडच अशी भितींत लिंपून टाकली तर घरात बोलायचं कुणी कुणाशी? आपले पंखेराव तरी आहेत ना?”

“नाही ग. माझ्या तोंडात एसी लावणार आहेत म्हणे. त्यातच असतो पंखा!”

“म्हणजे आता आयुष्यभर तू तोंडात एसी धरुन बसणार? कमाल आहे!! आमच्या तोंडात वाटेल त्या गोष्टी कोंबणारे हे कोण शहाणे?”

“रागावू नकोस ताई. उद्यापासून माझी लाइफस्टाइलच चेंज होणार आहे.”

“अगं मला नीट समजेल असं सांग गं..”

“उद्यापासून उघडणं, बाहेर डोकावणं, बिजागऱ्यांनी किरकिरणं हे सारं बंद! आता फक्त गरगरत एका रेषेत सरकणं.

उद्यापासून मी स्लायडिंग होणारे ना!”

“व्वा! आणखी काय-काय होणारे?”

“तुला माहितंच आहे की.. या पांढऱ्या स्वच्छं काचांमुळे आपल्याला दुपारी त्या उन्हाचा किती त्रास होतो! पण उद्या मला रंगीत काचा लावणार आहेत. मस्त डार्क चॉकलेटी काचा!

आता उद्यापासून सकाळ नंतर डायरेक्ट संध्याकाळं! नो

दुपार!!

एकदम कूSSल!! ”

“मला सांग हे सगळं तुला आवडतंय?

अगं त्या चॉकलेटी काचांमुळे रंगांधळी होशील तू!

आणि त्या एसीमुळे घरातली माणसं जरी थंड झाली तरी तुझं डोकं नेहमीच तापलेलं असेल!

काळजी घे स्वतःची..”

“ताई तू म्हणतेस ते खरंय!

मला बाहेरुन कुणीही कसंही बदलवलं तरी मी आतून तशीच राहीन! सकाळी सकाळी स्वतःतून बाहेर डोकावणारी! आणि संध्याकाळी अंतर्मूख होणारी!!”

हे ऐकल्यार ताई स्वच्छं काचेने हसली आणि म्हणाली,“उघडा,मिटा किंवा सरका पण स्वतःतून बाहेर डोकवा, हे ज्यांना जमलं त्यांनाच खरं जग दिसलं” ही चिनी म्हण तू ऐकलीच असशील की?”

हे ऐकताच पहिली समाधानाने हसली. यातूनच दुसरी काय ते समजली!

::::::::::::::::::::::::::::::::

::::::::::::::::::::::::::::::::

:::::::::::::::::::::::::::

–राजीव तांबे.

# गणित भुताटकी




गणिताची परीक्षा जवळ आली की सगळ्यांच्याच पोटात बाकबुक सुरू होते. वर्गमूळ, घनमूळ, क्षेत्रफळ, घनफळ अशा निरनिराळ्या मूळा-फळांची पचवावी लागणारी किचकट बेचव सूत्रं. सरासरी, दिवाळखोरी, वर्गवारी, शेकडेवारी, अशा वाऱ्यांची करावी लागणारी

आकडेमोड. काम चुकार कामगार व त्यांच्या अर्धवट कामांचे मुलांना करावे लागणारे हिशोब. भलतंच व्याज घेणाऱ्या, भरमसाठ कर्ज काढणाऱ्या व कर्जाचे मधलेच हप्ते चुकविणाऱ्या लबाड माणसांच्या मदतीसाठी मुलांना मोजावे लागणारे

चक्रवाढव्याज. उगाच नको-नको ती खरेदी करुन मग उरलेले पैसे मुलांनाच मोजायला सांगणारी गणितातली बिनडोक माणसं, या साऱ्यांचा मुलांनी धसकाच घेतला होता. गणितात नेहमी मोठ्या माणसांनीच व्यवहारात काहीतरी गोंधळ घालायचे आणि मग बिचाऱ्या मुलांनीच ते गणित करुन सोडवायचे.. असं का?




गणितातली मोठी माणसं आपल्या कर्जाचा,व्याजाचा हिशोब आपल्याआपण करायला कधी शिकणार? आणि वर्गातल्या साध्या गरीब मुलांची त्या 'द.सा.द.शे. किंवा मदक भागिले १००' यातून कधी सुटका करणार?

मोठी माणसं शेतं विकत घेणार आणि त्याचं क्षेत्रफळ काय मुलं मोजणार? त्या शहाण्या माणसांच्या शेताला कुंपण घालण्यासाठी किती तार लागते, हे पण त्यांना लहान मुलांनीच गणित करुन सांगायचं का? कुंपण घालता येत नाही तर मग शेत कशाला घेतात, ही माणसं?

ही मोठी माणसं खरंच कधी सुधारणार? आपली गणितं

आपल्याआपण कधी सोडवायला शिकणार? मुलांसाठी मुलांचीच चांगली मस्त धमाल गणितं का नसतात?.. असे प्रश्न नेहमीच



मुलांना पडायचे. 'गणितं नेहमी वहितंच का सोडवायची? एखादं गणित प्रत्यक्ष सोडवता येईल का? अं.. म्हणजे..' असा विचार रैनाच्या मनात येत होता, तोच तिच्या कानावर हळूच कुणीतरी फूंक मारली. रैना शहारली! तिला कळलं कोण आलं आहे ते.

रैनाच्या मनातली गोष्ट प्रेमळ भुताने ऐकली. प्रेमळ भूत रैनाच्या उजव्या कानात हळूच खिशीफिशी हसत
म्हणालं,"ओके..बोके..पक्के.. काम शंभर टक्के!"

नेहमी शेवटचा पेपर गणिताचा असतो.

रैना, प्रिया, रोहन आणि राधा या चौघांनी ठरवलं की यावेळी आपण गणिताचा सॉलीड अभ्यास करायचा आणि भरपूर मार्क मिळवायचे.

गणितात दोन प्रकारच्या परीक्षा असतात. लेखी आणि तोंडी.

रैना आणि रोहनला तोंडी परीक्षची भीती वाटते. तर प्रियाला लेखी परीक्षेची जाम भीती वाटते. पण राधाला मात्र सगळ्याचीच भीती वाटते. यावर्षी गणिताच्या परीक्षेच्या आदल्या दिवशी सुटी होती. म्हणून मग राधाने या तिघांना सुटीच्या दिवशी आपल्याच घरी अभ्यासाला बोलावलं.

परीक्षेच्या आदल्या दिवशी तिघं जणं राधाच्या घरी जमले. दुसऱ्या दिवशी दोन भागात परीक्षा होती. सकाळी लेखी परीक्षा. दुपारी तोंडी परीक्षा.

राधाचे बाबा म्हणाले,“अरे तुम्ही चौघांनी मिळून अभ्यास करा. मग कुठली भीती? एकमेकांनी एकमेकाला शिकवा. काऽऽय?”

इतक्यात कुठूनतरी आवाज आला, आणि तो फक्त बाबांनाच ऐकू आला,“बाबा, मी कुणाला शिकवू?”

बाबांना कळलं नाही. ते जरा आवाज चढवूनच म्हणाले,“अरे सगळ्यांनी सगळ्यांना शिकवा,.. म्हंटलं नाही का मी आत्ता.. अं..?”

त्यावर पुन्हा आवाज आला,“हंऽऽ हूऽऽ”

बाबा कुणाशी बोलताहेत हे पाहण्यासाठी रैना व प्रियाने त्यांच्याकडे पाहिलं.

रैनाला काय ते समजलं.

प्रिया मात्र गोंधळली.

सगळे जण लेखी परीक्षेच्या अभ्यासाला बसले.

पण का कुणास ठाऊक, त्याचं अभ्यासात लक्ष लागेना. कितीहीवेळा बंद केला तरी आपोआप टिव्ही सुरु व्हायचा किंवा सिनेमातली हिट गाणी ऐकू यायची. नाहीतर बटाटेवडे, पावभाजी यांचा झमझमीत वास यायचा. घराच्या भिंतींचे रंगच बदलत आहेत असं वाटायचं. तर काहीवेळा जमिनीवर ठेवलेलं पेन उडी मारुन कानावर जाऊन घट्ट बसायचं.

मुले वैतागली. त्यांना कळेना हे काय विचित्र?

रैना थोडी बाजूला गेली.

मग तिने हळूच डाव्या हाताची मूठ घट्ट बंद केली.

उजव्या हाताच्या तळहातावर डाव्या हाताची मूठ ठेवली.

उजव्या हाताच्या चार बोटांनी ही मूठ पकडली पण अंगठा मात्र सरळ ठेवला. मग डोळे बंद करुन मुठीमधे तीन वेळा फुंक मारत, दोन वेळा हळूच म्हणाली,'प्रेऽऽऽमळ भूऽऽत.. .. प्रेऽऽऽमळ भूऽऽत' त्याक्षणी रैनाच्या कानावर कुणीतरी हलकेच फूंक मारली. आणि खिशिफिशी हसत प्रेमळ भूत म्हणालं,"बोल रैना तुला काय मदत करु?

जगातल्या सगळ्या लेखी गणितांची उत्तरं शून्य-शून्य करु? की मुलांची तोंडी परीक्षा घेणाऱ्या मोठ्या माणसांचे दातच गायब करुन त्यांची बोलतीच बंद करु?" " असलं काही नको रे भुता." असं म्हणत, मग रैनाने मनातल्या मनात प्रेमळ भुताला सगळं सांगितलं. आणि पुढे म्हणाली "आता उद्या तूच आम्हाला मदत कर."

“ओके..बोके..पक्के.. काम शंभर टक्के” प्रेमळ भूत



खुसफूसलं.

रैना चटकन परत येऊन सगळ्यांना म्हणाली,“मला वाटतं आपला भरपूर अभ्यास झालाय. आता आपण आरामात खेळायला जाऊया.”

हे ऐकताच बाकीचे घाबरुन किंचाळत म्हणाले,“काऽऽय? रैना तुझी तब्येत बरी आहे ना? अगं सुरुवात व्हायच्या आधीच भरपूर अभ्यास झाला? नाही.. नाही! आम्ही करणार अभ्यास. नाहीतर उद्या शाळेत आपली धुलाई व घरी आल्यावर चंपी होईल. हवं तर तू जा खेळायला. आमची काही हिंमत नाही.”

सगळ्यांना टाटा करुन रैना हसतच खेळायला गेली. बाकीचे मात्र तोंडं लांब करुन अभ्यास करत बसले.

परीक्षेचा दिवस उजाडला.
सगळ्या मुलांच्या चेहऱ्यावर भीती दिसत होती. शेवटच्या क्षणापर्यंत काही मुले

पुस्तकात पाहून सूत्रं पाठ करत होती. तर काही मुले वह्या हातात घेऊन सोडवलेली गणिते पाहात होती. काही मुली भूमिती मधल्या आकृत्या पाहात होत्या. काही मुले व मुली हात जोडून व अर्धवट डोळे बंद करुन कुठलेसे मंत्र पुटपुटत होते. तर काही, गळ्यातल्या लॉकेटला किंवा मनगटावर बांधलेल्या रंगीत दोऱ्यांना पुन्हा-
पुन्हा नमस्कार करत होते.

इतक्यात घंटा झाली. सगळी मुले घाबरुनच आपापल्या जागेवर बसली.

हातात पेपरचा गठ्ठा घेऊन जोशी सर वर्गात आले. सरांच्या पाठोपाठ मुख्याध्यापक आले. मुलांकडे डोळे वटारुन पाहात मुख्याध्यापक म्हणाले,"लक्षात ठेवा, यावेळी जो
गणितात नापास तो सर्व विषयात नापास!
आणि.. नापास मुलांना या शाळेत जागा नाही. मला या शाळेत फक्त हुशारच मुलं हवी आहेत. कळलंय का? आणि म्हणूनच यावेळी गणिताचा पेपर मी मुद्दामहून एकदम कठीण काढला आहे. आत्ता १०० मार्कांची लेखी परक्षा आहे. या लेखी परीक्षेत ज्याला १०० पैकी १००
मार्क मिळतील तोच पास. अर्धा मार्क जरी कमी मिळाला तरी नापास! व नापास
म्हणजे..शाळेतून लगेचच हकालपट्टी. दुपारी १०० मार्कंची तोंडी

परीक्षा आहे. त्यालासुध्दा हाच सोपा नियम लागू आहे. लेखी परीक्षेच्यावेळी तुमच्यासमोर फक्त मीच वर्गात बसणार आहे. तुमची तोंडी परीक्षा माझ्यासमोरच जोशी सर घेतील. कळलंय?”

पेपरचा गठ्ठा टेबलावर टाकत जोशी सर मुख्याध्यापकांकडे घाबरुन पाहात, वर्गातून निघूनच गेले.



‘१०० पैकी १०० मार्क मिळाले तरंच पास, नाहीतर नापास.’ हे ऐकताच मुले
गारठली. त्यांचे चेहरे
पांढरे फटक पडले.
घशाला कोरड
पडली. काही मुलांचे
पाय भीतीने लटलटू
लागले. तर काहींचे
हात थरथरु लागले.

मुख्याध्यापकांनी प्रश्नपत्रीका व उत्तरपत्रीका मुलांना दिल्या व

ते फळ्याकडे पाठ करुन, मुलांकडे पाहात खूर्चिवर बसले.

मग रैनाने हळूच डाव्या हाताची मूठ घट्ट बंद केली. उजव्या हाताच्या तळहातावर डाव्या हाताची मूठ ठेवली. उजव्या हाताच्या चार बोटांनी ही मूठ पकडली पण अंगठा मात्र सरळ ठेवला. मग डोळे बंद करुन मुठीमधे तीन वेळा फुंक मारत, दोन वेळा हळूच
म्हणाली,'प्रेSSSमळ भूSSत.. .. प्रेSSSमळ भूSSत' त्याक्षणी रैनाच्या कानावर कुणीतरी हलकेच फूंक मारली. आणि खिशिफिशी हसत प्रेमळ भूत म्हणालं,"बोल रैना तुला काय मदत करु? रैना त्याला म्हणालि,"अरे आता आम्हा सगळ्यांनाच मदत कर. नाहीतर आमची
आत्ता धुलाईच होईल." ते खुसफुसलं,"ओके..बोके..पक्के.. काम शंभर टक्के"

मुख्याध्यापकांच्या मागे मोठा काळा फळा होता. त्या फळ्याचा टीव्ही झाला... ..आणि आवाज आला,"गणित क्रमांक १ पाहा आणि लिहा."
हे पाहून व ऐकून वर्गातली मुले घाबरुन किंचाळणारच होती.
पण कुणाच्याच तोंडातून आवाज फुटला नाही.
मुलांनी फळ्यावरच्या टीव्हीत पाहून पहिले गणित भराभर सोडविले.

मुख्याध्यापकांनी चमकून मागे पाहिले,पण त्यांना फक्त काळा फळाच दिसला. ते वैतागून ओरडले,“माझ्याकडे पाहात काय लिहिताय? खाली पाहून लिहा? माझ्या मिशांना का लिंबं लागलीयेत? की माझ्या डोक्यावर सरडा बसलाय?”

आणि खरंच, मुख्याध्यापकांच्या मिशांवर दोन लिंबं व नाकाच्या शेंड्यावर एक लिंबू तरंगू लागलं आणि एक सरडा त्यांच्या डोक्यावर मांडी घालून बसला.

अचानक नाकाच्या शेंड्यावरचं लिंबू गरगर फिरू लागलं. डोक्यावरचा सरडा डिस्को करू लागला.

हे पाहून आधी मुले घाबरली व मग हसत म्हणाली,“सऽऽर लिंबूऽऽऽऽ, सऽऽऽर लिंबूऽऽसरडा.”

दोन्ही हात वर करत त्यांनी विचारलं,“कुठायत?”

पुन्हा चमत्कार..

त्यांच्या दहा बोटांबर दहा लिंबं नाचू लागली, इकडून तिकडे पळू लागली. सरांनी घाबरुन हात झटकले. पण लिंबं मात्र तिथेच. २९ लिंबं जमिनीवर न पडता, मुख्याध्यापकांच्या अंगावर पळापळी, पकडापकडी खेळू लागली. त्यांच्या डोक्यावर आणि पोटावर टणाटण उड्या मारू लागली.

मुले जोरात खुसफुसली,“सर, नाकावर लिंबू. कानावर लिंबू.

सर मिशीत लिंबू. डोक्यावर लिंबू.

सर हातावर लिंबू. पायावर लिंबू.

सर बोटांवर लिंबू. पोटावर लिंबू.

लिंबू टिंबू.
टिंबू लिंबू."

मुले हसून हसून बेजार झाली. काही मुले हसता हसता बाकावरुन खालि घसरली.

मुख्याध्यापक गडबडले.

नाकावरची, पोटावरची, मिशीतली, कुशीतली आणि हातावरची व पायावरची लिंबं खाली पडावीत म्हणून ते वेड्यावाकड्या उड्या मारत, हातवारे करत लिंबू डान्स करू लागले. थयथयाट करू लागले.

"हा काय विचित्र प्रकार ? ही काही भुताटकी तर नाही ना ? या लिंबांना वेड लागलंय कि मला ? ही खालि का पडत नाहीत ?"मुख्याध्यापक चाचरत म्हणाले.

आणि एकदम शॉक लागल्यासारखे लिंबांना म्हणाले,"व्हा दूर.."



त्याक्षणी सगळी लिंबं सरड्याकडे गेली. लिंबं सरड्याकडे जाताच त्या लिंबांचे छोटे-छोटे सोनेरी मणी झाले.

सरडा आपला एक पाय डोक्याखाली घेऊन मुख्याध्यापकांच्या

डोक्यावर झोपला. आणि तीन पायांनी हे २९ सोनेरी मणी आरामात हवेत उडवत, पायाने झेलत राहिला. यामुळे मुख्याध्यापकांचं डोकं हुळहुळू लागलं, त्यांचे डोळे मधे आले.

हा चमत्कार पाहताना तर मुलांचे डोळे लिंबाएव्हढे झाले.

“ तुम्ही बघताय काय माझ्याकडे ? आधी खाली पाहात गणितं करा. नाहितर नापास करुन टाकीन सगळ्यांना.” मुख्याध्यापक वैतागून मुलांवर ओरडले.

मुलांनी पटकन माना खाली घातल्या आणि त्यांना आश्चर्याचा धक्काच बसला...

अतिशय सुंदर अक्षरात सर्व मुलांनी, सर्व गणिते सोडविलेला पेपर तयार होता !

मुले आनंदाने टाळ्या वाजवत ओरडली,“सर झाऽऽला पेपर.”

आणि त्याक्षणी.. ..चमत्कार झाला.. ..

पुन्हा सगळे पहिल्यासारखे झाले !

मुख्याध्यापकांना वाटलं आपल्याला भास झाला की काय ? त्यांनी हळूच मिशीवरुन, पोटावरुन हात फिरवला, नाक चोळलं पण त्यांना कुठेच लिंबं आढळली नाहीत. गुपचूप डोक्यावरून हात फिरवत सरडा –बिरडा आहे का पाहिलं. पण छे. काहीच नाही.

मुलांचे सुंदर अक्षरातले पेपर पाहून मुख्याध्यापक खूश होऊन म्हणाले,“व्वा ! काय वळणदार अक्षर ! व्वा काय टापटीप !

व्वा व्वा सगळी गणितं बरोबर!! व्वा व्वा व्वा, माझ्या समोरची ही मुले आहेतच हुशार!!”

इतक्यात त्यांच्या मागून एक गुळगुळीत आवाज आला. “मी पण आहे की होSSS तुमच्या वर्गात..”

मुख्याध्यापकांनी दचकून मागे वळून पाहिलं. पण तिथे कुणीच नव्हतं.

मुलांकडे पाहात ते म्हणाले, “व्वा लेखी परीक्षा तर छान झाली. पण अजून तोंडी परीक्षा बाकी आहे. आणि जोशी सरांबरोबर मी ही येणार आहे.”

मुख्याध्यापक वर्गातून तरातरा निघून गेले.

मुले मात्र भिऊन बसून होती.

दुपारच्या सुटीत मुले जाम टेन्शन मधे होती.

कारण आता तोंडी परीक्षेला जोशी सर आणि स्वतः मुख्याध्यापक पण येणार. लेखी परीक्षेला कसा कुणास ठाऊक पण चमत्कार झाला आणि जीव वाचला. पण आता तोंडी परीक्षेला काय होणार?

मुलांनी दुपारचे डबे आणले होते. पण कुणालाच जेवायची इच्छा होईना. सगळ्यांना एकच चिंता.. आता तोंडी परीक्षेला नापास झालो तर काय करायचं?

रैना सगळ्यांना म्हणाली, “अरे आधी आपण डबा खाऊया

मग काय करायचं ते ठरवूया."

कपाळावर हात मारत प्रिया म्हणाली,"आता काय ठरवायचं? नापास झालो तर शाळा सोडावी लागेल. या मुख्याध्यापकांचि कमालच आहे. माझी तर आता काही खाण्याची इच्छाच गेलीय." बाकीची मुलं पण तसंच म्हणू लागली.

सगळी मुले दुपारचे डबे घेऊन गोलात बसली होती.

नेहमी ही मुले अंगत पंगत करत खातात. आज मात्र सगळ्या मुलांचि तोंडं भुकेने सुकलेली आणि समोर बंद डबे.

रैना जरा बाजूला गेली.

रैनाने हळूच डाव्या हाताची मूठ घट्ट बंद केली.

उजव्या हाताच्या तळहातावर डाव्या हाताची मूठ ठेवली.

उजव्या हाताच्या चार बोटांनी ही मूठ पकडली पण अंगठा मात्र सरळ ठेवला.

मग डोळे बंद करुन मुठीमधे तीन वेळा फुंक मारत, दोन वेळा हळूच म्हणाली,'प्रेSSSमळ भूSSत.. .. प्रेSSSमळ भूSSत'

त्याक्षणी रैनाच्या कानावर हलकेच कुणीतरी फुंक मारली.

आणि खिशिफिशी हसत प्रेमळ भूत म्हणालं,"बोल रैना तुला काय मदत करू? गरम होत असेल तर या सर्व मुलांना हिमालयातल्या बर्फात बुडवू? की सगळ्या वर्गात काठोकाठ खचाखच बर्फ भरुन टाकू?"

" असलं काही नको रे भुता." असं म्हणत, मग रैनाने

मनातल्या मनात प्रेमळ भुताला सगळं सांगितलं. आणि पुढे म्हणाली “आता तूच या मुलांना मदत कर.”

“ओके..बोके..पक्के.. काम शंभर टक्के” प्रेमळ भूत खुसफूसलं.

आणि अचानक मुलांच्या डब्यांची झाकणं थरथरू लागली. अलगद थोडी वर उचलली गेली.

डब्यातून गरमागरम पाव-भाजी, मसाला ऑम्लेट, बटाटे वडे, कांदा भजी, जिलेबी यांचा घमघमाट येऊ लागला.

काहींच्या डब्यातून आम्रखंड, गुलाबजाम, पुरणपोळ्या बाहेर डोकावू लागल्या.

मुले आनंदाने किंचाळू लागली,“वॉSSSSव! माहितीच नाही की आज हे डब्यात आहे. चला खाऊया.. आडवा हात मारुया. चलोSS आक्रमण..”

मुलांच्या किंचाळ्या ऐकून जोशी सर धावत आले.

मुलांची खाऊ पार्टी पाहून तर त्यांना धक्काच बसला. डब्यात पोळी भाजी न आणता, हे असले पदार्थ? ‘आणि हे मुख्याध्यापकांना कळलं तर?’ या भीतीनेच त्यांचं तोंड उघडलं.

इतक्यात रोहनने चटकन त्यांच्या तोंडात तीन मोठे गुलाबजाम कोंबले आणि हातात चाळीस जिलब्यांची चवड ठेवली.

सरांच्या पाठोपाठ मुख्याध्यापक आले.

तोंडात गुलाबजामचा बकाणा भरलेले व हातात जिलब्यांचा

ढिगारा घेतलेले जोशी सर पाहताच, मुख्याध्यापक रागाने लालेलाल झाले.

ते रागाने ओरडत म्हणाले,“द्या त्या जिलब्या इकडे. अहो, एव्हढा ढिगारा खाल्लात तर आत्ता ॲम्ब्युलन्स बोलवायला लागेल. शाळेत जिलब्या खायला येता की.. ..?” आणि मुख्याद्यापकांनी जोशी सरांच्या हातातल्या जिलब्या हिसकावून घेतल्या. व कुणाचं लक्ष नाहीसं पाहून त्या जिलब्या ते तोंडात कोंबणारच होते, पण.. त्याक्षणी मुख्याध्यापकांना वाटलं की आपल्या काहीतरी विचित्र भास होतोय. कारण

त्यांच्या हातात भरपूर रंगीबेरंगी खडू होते आणि जोशी सरांच्या हातात डस्टर.

ते दोघे ही परत गेले.

जाताना मुख्याध्यापक हातातल्या खडूंकडे पाहात दात-ओठ खात होते. तर जोशी सर मात्र तोंड बंद ठेवून हळूच गुलाबजाम खात होते.

मुले मस्त चापून चोपून जेवली. वॉटरबॅगमधलं थंडगार सरबत प्यायली.

तोंडी परीक्षेसाठी अशी तयार झाली.

जोशी सर आणि मुख्याध्यापक वर्गात आले.

मुले सावरून बसली.

रैनाने हळूच डाव्या हाताची मूठ उजव्या हाताच्या तळहातावर

घासत इशारा केला.

खिशीफिशी हसत ‘ते ’आलं.

रैना त्याला म्हणालि,“अरे आता आम्हा सगळ्यांनाच मदत कर. नाहीतर आमची घरी चंपी होईल.”

ते खुसफुसलं,“ओके..बोके..पक्के.. काम शंभर टक्के”

जोशी सर म्हणाले ,“आता मी तुम्हाला एक गणित घालतो. मग मुख्याध्यापक ज्याला विचारतील त्याने गणिताचं उत्तर द्यायचं आहे. ही तोंडी परीक्षा आहे. त्यामुळे कुणीही गणित लेखी सोडवायचं नाही. गणित मनातल्या मनात सोडवायचं व उत्तर तोंडीच द्यायचं.समजलं ?”

सर्व मुलांनी माना हलवल्या.

“दाजीबाने विहिर खणण्यासाठी ४ माणसांना बोलवलं. त्यांनी एका तासात ६ फूट खड्डा केला..” सर पुढे काही बोलण्याआधीच वर्गात ५ माणसं आली.

त्यातला दाजिबा कोपऱ्यात उभा राहिला. बाकीची ४ माणसे वर्गात दे दणादण खणू लागली.

वर्गात सगळीकडे धूळ उडू लागली. मातीचे फवारे उडू लागले.

मातीचे ढिगारे उभे राहिले. दगड धोंड्यांचा ढीग जमा जाला.

वर्गातल्या धुरळ्याने मुले शिंका देऊ लागली. आरडाओरडा करू लागली. काही मुले घाबरून बाकावर चढून बसली. तर काही मुले वर्गातल्याच मातीच्या-दगडांच्या ढिगावर चढू लागली. काम

करणाऱ्या माणसांना याचा काहीच त्रास होत नव्हता!

सरांचे कपडे धुळीने भरले. सर घाबरुन बाजूला सरकले. मुख्याध्यापक बसल्याबसल्याच थरथरत होते.

त्या ४ माणसांनी ९ मिनिटात ६ फूट खोल खड्डा केला.

मातीच्या एका ढिगावर बसत दाजीबा सरांना म्हणाला,"हं.. आता पुढे बोला ते गणित.."

सर भीत भीत म्हणाले,"काम लवकर होण्यासाठी दाजीबाने आणखी ३ माणसं बोलावली.. .."

दाजीबाने हाक मारताच, वर्गात आणखी ३ माणसं आली.

त्या तिघांनी दे धपाधप कामाला सुरुवात केली.

वर्गातला हा सगळा प्रकार पाहताना मुख्याध्यापकांचा तर भीतीने गोठून पुतळा व्हायची पाळी आली.

दाजीबाने हातात दगड उचलत, सरांना बोलण्याची खूण केली.

सर चाचरत म्हणाले,"४ माणसांनी एका तासात ६ फूट खड्डा केला, तर मुलांनो आता सांगा, ७ माणसांनी मिळून पुढच्या तासात किती खोल खड्डा केला असेल?"

दाजीबा हातातला दगड भिरकावत, वैतागून म्हणाला,"आवो सर, हे मुलांना काय विचारता? त्यांना काय कळणार? ज्यांनी खड्डे खणले त्यांना विचारा की.

थांबा सर. मोजूनच सांगतो तुम्हाला."

दाजीबाने खिशातून टेप काढली. एका कामगाराला दिली.

दोन कामगार खड्यात उतरले. त्यानी मोजलं आणि म्हणाले,“हां, बरोबर आठ फूट नऊ इंच.”

मुले पण ओरडली “आठ फूट.. आऽऽठ फूट नऊ इंच.”

दाजीबाने विचारलं,“अहोऽऽ मुख्याध्यापक, काऽऽय बरोबर आहे ना उत्तर?”

मुख्याध्यापक चिरचिरत म्हणाले,“न..नाही! दोन तासात खड्डा जास्त व्हायला पाहिजे. कमीत कमी दहा फूट पाच इंच.”

दाजीबा रागावून म्हणाला,“साहेब,कमालच आहे तुमची? सगळी माणसं एकाच स्पीडने काम करायला, ती का मशीन आहेत का हो मुख्याध्यापक? आणि या सदूच्या हाताला लागलंय ते दिसलं नाही वाटतं तुम्हाला?

आवो खड्याची गणित वहीत सोडवायची नाहीत तर मातीत खणायची! कळलं का?”

दाजीबा आपल्या कामगारांना म्हणाला,“चला गड्यांनो, आपण दुसऱ्या शाळेत जाऊ.”

दाजीबा आणि त्याचे ७ कामगार निघून जाताच वर्गातला खड्डा बुजला. वर्ग पहिल्यासारखा चकाचक झाला.

मुख्याध्यापक घाम पुसत म्हणाले,“सर, दुसरं साधंच गणित घाला. त्यात कामगारबिमगार कुणी नकोत आणि खड्डे-बिड्डे पण नकोत हां.”

डोकं खाजवत जोशी सर म्हणाले,“ऐका मुलांनो, २ पाणघोडे

रोज ८९ किलो गवत खातात.. .”

आणि त्याचक्षणी..

वर्गातली बाकं हिरवट गढूळ पाण्यावर डोलू लागली.

जिकडे तिकडे बुळबुळीत शेवाळं

तरंगू लागलं.

वर्गात जिकडे तिकडे हिरवंगार गवत उगवलं.

चिखालाने बरबटलेले २ पाणघोडे डबाक डबाक करत वर्गात आले.

एका पाणघोड्याने मुख्याध्यापकांजवळ जाऊन मोठा जबडा उघडला, आणि खणखणीत आवाजात म्हणाला,“नॉमॉस्कॉर सॉर.”

पाणघोड्याचा तो प्रचंड जबडा, ते टोकेरी सुळे व धारदार दात आणि वळवळणारी जीभ पाहून मुख्याध्यापक भीतीने थरथरू लागले. ते गडबडून खूर्चीतून खाली पाण्यातच पडले.

जोशी सर तर घाबरुन खिडकीवरच चढले.

पाणघोडा मुलांकडे पाहात म्हणाला,“हाSSय मित्रांनोSS”

हे ऐकताच मुलांनी आनंदाने पाण्यात धपाधप उड्या मारल्या. काही मुले पाणघोड्यांच्या पाठीवरच जाऊन बसली. काही मुले पाणघोड्यांच्या पाठीवर चढून पाण्यात उड्या मारु लागली. काही मुले पाणघोड्यांना गवत चारु लागली. पाणघोडे आणि मुलं एकमेकांत मिसळून गेली.

मग थोड्यावेळाने एक पाणघोडा टेबलावर बसत म्हणाला,“सॉर ऑमचं गॉवत खॉऊन झॉलंय. नुसतॉ गॉवत खॉऊन कंटाळॉ ऑलाय.”

मग तो पाणघोडा मुख्याध्यापकांच्या समोर जाऊन म्हणाला,“गवतासोबत काहीतरी तोंडी लावायला द्या. नाहीतर.. तुम्हालाच.. ..”

दुसरा पाणघोडा ढुरढुरला,“चला, पुढचॅ गॉणित सॉंगा. आम्हॉला तॉहॉन लॉगलीय हे पण लॉक्षात ठेवॉ..”

पाण्यात पडलेले मुख्याध्यापक कसेबसे उठले. त्यांच्या नाकावर, डोक्यावर शेवाळं लागलं होतं. तोंड पुसत व आपले चिखलाने माखलेले ओले कपडे सावरत ते म्हणाले,“अहो जोशी सर, यांना पाणी पाजा आणि हे गणित एकदांचं संपवा; नाहीतर हे मला संपवतील.”

जबडा उघडून पाणघोडे जोशी सरांकडे रोखून पाहू लागले.

एका हाताने खिडकी पकडत दुसऱ्या हाताने त्यांनी त्या पाणघोड्यांना पाणी पिण्याची खूण केली.

शेपटी हलवत पाणघोडे म्हणाले,“धॉन्यॅवॉद जॉशी सॉर.”

पाणघोडे मटामट सगळं पाणी प्यायले.

एक पाणघोडा मुख्याध्यापकांकडे वळत म्हणाला,“ऑतॉ ऑम्ही पुन्हॉ कॉधी येऊ?”

मुख्याध्यापक वैतागून धडपडत उठले आणि ते काही बोलण्या आधीच कसं कुणास ठाऊक पण, खिडकीवरुन खाली उडी मारत जोशी सर जोरात म्हणाले,“अरे पाणघोड्यांनो विचारताय काय..रोजच या. येताना सोबत मगरी, सुसरी, माकडं,बोकडं या सगळ्यां पण घेउन या. खायला,प्यायला आणि लोळायला इकडेच या. काय हवा तो गोंधळ इथे घाला. ही

शाळा आपलीच आहे समजा. हे मुख्याध्यापक तर तुम्हाला काहीच बोलणार नाही.”

पाणघोडे खॉऽऽ खॉऽऽ खॉऽऽ करत, गडाबडा लोळत हसू लागले.

मुले आनंदाने टाळ्या वाजवू लागली. शिट्या वाजवू लागली.

मुख्याध्यापक जोशी सरांकडे डोळे वटारुन रागा-रागाने पाहू लागले.

मुख्याध्यापकांकडे पाहात जोशी सर चाचरत म्हणाले,“म.. म.. मी नाही बोललो. माझ्या तोंडातून दुसरंच कुणीतरी बोललंय. खरंच.. हे..हे पाहा मिस्टर पाणघोडे, मी खरंच बोलतोय.. ..”

हे ऐकताच मुख्याध्यापक रागाने जोरात किंचाळले,“काऽऽय ?मी मिस्टर पाण.. ”

त्याक्षणी पाणघोडे वर्गातून निघून गेले.

पुन्हा वर्ग आधी होता तसा चकाचक झाला.

मुख्याध्यापकांनी हळूच शर्ट पँटवरून हात फिरवला. त्यांचे

कपडे सुकले होते.

जोशी सर मुख्याध्यापकांना म्हणाले,“मुलांना आणखी एक शेवटचं गणित घालू?”

दोन्ही हातांनी कान दाबत मुख्याध्यापक म्हणाले,“नकोऽऽ नको.
आता मला काही ऐकायचं नाही.
ही सगळी हुशार मुले तोंडी परीक्षेत पण पास झाली आहेत.”

इतक्यात मुख्याध्यापकांच्या मागून एक गुळगुळीत आवाज आला,“मी पण पास झालोय ना सऽऽर?”

मुख्याध्यापक मागे न बघताच वर्गातून बाहेर सुसाट धावत सुटले.

गणितात पास झाल्याने मुले मात्र वर्गात नाचू लागली.

जोशी सर हे सारं आऽऽ करुन पाहात होते.

‘प्रेमळ भुताने’ तुम्हाला काय मदत करावी असं वाटतं?

न भीता भुताला कळवा. त्याला इमेल करा. प्रेमळ भूत तुमच्या

इमेलची नेहमीच वाट पाहात असतं.

प्रेमळ भूत फक्त मुलांच्याच इमेलला उत्तर देतं. कारण, प्रेमळ भूताला कोण आवडतं हे तुम्हाला माहितच आहे.

लक्षात ठेवा, ‘ओके..बोके..पक्के तर काम शंभर टक्के.’

-राजीव तांबे. –

premalbhoot@gmail.com



मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती यांना इंटरनेटवर मानाचे स्थान असावे या उद्देशाने अनेक संस्था आणि व्यक्ती आज काम करत आहेत. ई साहित्य प्रतिष्ठान त्यातलीच एक. नेटाक्षरी हे **कवितांचे** ई साप्ताहिक, ई स्टाप हे **विनोदा**ला वाहिलेले ई नियतकालिक, दुर्ग दुर्गट भारी ही महाराष्ट्रातील दुर्ग **किल्ल्यांची माहिती** देणाऱ्या ई पुस्तिकांची मालिका, **स्वरनेटाक्षरी** हे मराठीतले पहिले ऑडिओ ई नियतकालिक, मराठी कसे लिहावे, ई पुस्तक कसे बनवावे, **शास्त्रीय संगीत** कसे ऐकावे (संगीत कानसेन) आदी ई लर्निंगची साधने, आणि आजवर प्रसिद्ध झालेली अनेक ई पुस्तके अशा आजवरच्या **दिडशेहून प्रकाशनांचा** पल्ला ई साहित्य प्रतिष्ठानने गाठला आहे. **सुमारे एक लाख वाचकांपर्यंत ही प्रकाशने पोहचतात.**




लहान मुलांना इंटरनेटच्या जगात प्रवेश करायला उपयोगी पडावे म्हणून सुरू केलेला बालनेटाक्षरी हा प्रयत्न आपल्याला कसा वाटला ते कळवा. तसेच ई साहित्य प्रतिष्ठान ची इतर प्रकाशने विनामूल्य मिळण्यासाठी लिहा व भेट द्या.

नवीन प्रकाशने नियमित मिळण्यासाठी

esahity@gmail.com

आजवरची प्रकाशने वाचण्यासाठी

www.esahity.com